उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. इएसटी-२०१९/५९१/प्र.क्र.७८/उद्योग-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०७ नोव्हेंबर, २०१९.

संदर्भ : १) शासन अधिसूचना, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्र : आयएसटी-२१७०/६०२/ उद्योग-३, दिनांक १०.०७.१९८४
२) शासन निर्णय क्रमांक, आयएसटी-२०११/प्र.क्र.२८२/उद्योग-३, दि.२४.०७.२०१२
३) शासन निर्णय क्रमांक, नियुक्ती-१०१५/प्र.क्र.५५/उद्योग-३, दिनांक १७.११.२०१५
४) शासन निर्णय क्रमांक, परीक्षा-४११५/४१२/प्र.क्र.८४/उद्योग-३, दि.२३.०९.२०१५
५) शासन निर्णय क्रमांक, इएसटी-३४१८/९४/प्र.क्र.३०/उद्योग-३, दि.४.०९.२०१८
६) उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/आस्थापना-१/नियुक्ती/उ.उ.सं. परिविक्षा समाप्ती/२०१९/अे-११४१, दि.१४.०८.२०१९

**प्रस्तावना :**

उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ या पदावर संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये ६ उमेदवारांची व संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये १३ उमेदवारांची नियुक्ती करण्यात आली आहे. सदर उमेदवारांना संदर्भ क्र.१ च्या शासन अधिसूचनेतील ४ (अ) (एक) विहित केल्यानुसार २ वर्षांचा परिविक्षा कालावधी लागू आहे. संदर्भाधीन क्र.१ च्या अधिसूचनेनुसार या पदासाठी विहित केलेले परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यासाठी विभागीय परीक्षा नियम तयार करण्यात आले आहेत. त्यानुसार संदर्भ क्र.२ आदेशातील दोन उमेदवारांनी अतिरिक्त चौथ्या संधीत व संदर्भ क्र.४ आदेशातील ९ उमेदवारांनी दुसऱ्या संधीत सदर विभागीय परीक्षा उत्तीर्ण केली आहे.

ज्या अधिकाऱ्यांनी विभागीय परीक्षा उत्तीर्ण केली आहे त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणारा परिपूर्ण प्रस्ताव उद्योग संचालनालय, मुंबई यांचेकडून संदर्भ क्र.६ येथील पत्र व सहपत्रान्वये प्राप्त झालेला आहे. त्यानुषंगाने सदर प्रस्तावातील ११ परिविक्षाधीन उद्योग उपसंचालक (तां) गट-अ यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवर उद्योग उपसंचालक (तांत्रिक), गट-अ या पदावर संदर्भाधीन क्र.२ व ४ च्या शासन आदेशान्वये सरळसेवेच्या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस करण्यात आलेल्या अनुक्रमे ६ व १३ अशा एकूण १९ उमेदवारांनी नियुक्ती स्विकारली असुन सदरचे अधिकारी कर्तव्यावर रुजू झाले आहेत. त्यापैकी ६ उमेदवारांनी संदर्भ क्र.१ च्या अधिसूचनेनुसार विहित केलेल्या विभागीय परीक्षेच्या विहित व विशेष संधीमध्ये सदर विभागीय परीक्षा उत्तीर्ण केली असून त्यांचा परिविक्षाधीन कालावधी संदर्भ क्र.४ व ५ अन्वये समाप्त करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र. २ च्या आदेशातील दोन अधिकाऱ्यांनी सदर विभागीय परीक्षा विशेष अतिरिक्त चौथ्या संधीत व संदर्भ क्र.४ च्या आदेशातील ९ अधिकाऱ्यांनी दुसऱ्या संधीत उत्तीर्ण केली आहे. त्यानुषंगाने उद्योग संचालनालयाने त्यांच्या संदर्भ क्र. ६ च्या पत्रान्वये सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२९.२.२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदी व त्यासोबतच्या तपासणीसूचीतील विहित नमुन्यातील माहिती गोपनीय अहवालासह तयार करुन शासनास सादर केली आहे.

२. उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ या पदाच्या संदर्भ क्र. २ व ४ च्या नियुक्ती आदेशातील अटीनुसार खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांनी २ वर्षांचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला आहे. सदर अधिकाऱ्यांचा परिविक्षा कालावधी त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून समाप्त करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सदर दिनांकापासून खाली नमूद अधिकाऱ्यांची उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ या पदावरील नियुक्ती नियमित करण्यात येत आहे -

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | रुजू झाल्याचा दिनांक | रजा कालावधी (असल्यास) | परिविक्षा कालावधी समाप्त दिनांक | स्थानापन्न नियुक्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री.संतोष पंडितराव कोलते | ०६.०८.२०१२ | ४० दिवस | १४.०९.२०१५ | १५.०९.२०१५ |
| २ | श्री.नितीन भिमराव कोळेकर | २६.०७.२०१२ | ४१ दिवस | ०४.०९.२०१५ | ०५.०९.२०१५ |
| ३ | श्री.चेतन भाऊराव पाटील | ०७.१२.२०१५ | २२ दिवस | २८.१२.२०१७ | २९.१२.२०१७ |
| ४. | श्री.शिवकुमार सायण्णा मुद्दमवार | ०१.१२.२०१५ | ० दिवस | ३०.११.२०१७ | ०१.१२.२०१७ |
| ५ | श्री.संदीप बबन रोकडे | १०.१२.२०१५ | ० दिवस | ०९.१२.२०१७ | १०.१२.२०१७ |
| ६. | श्री.निलेश सुभाषराव निकम | १५.१२.२०१५ | २० दिवस | ०३.०१.२०१८ | ०४.०१.२०१८ |
| ७. | श्री.उपेंद्र किसन सांगळे | ०९.१२.२०१५ | १७ दिवस | २५.१२.२०१७ | २६.१२.२०१७ |
| ८. | श्रीम.सोनाली मेघराज देवरे (मोनाली गोपीनाथ पाटील.) | १०.१२.२०१५ | ४६ दिवस | २४.०१.२०१८ | २५.०१.२०१८ |
| ९. | श्रीम.करुणा विश्वानाथ खरात | १६.१२.२०१५ | २२ दिवस | ०६.०१.२०१८ | ०७.०१.२०१८ |
| १०. | श्रीम.अर्चना विपुल कोठारी (अर्चना नंदकिशोर शर्मा) | १६.१२.२०१५ | २७ दिवस | ११.०१.२०१८ | १२.०१.२०१८ |
| ११. | श्रीम.किर्ती चंद्रशेखर जगताप | १९.११.२०१५ | २६२ दिवस | ०८.०८.२०१८ | ०९.०८.२०१८ |

३. विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई यांनी उक्त आदेश सर्व संबंधित अधिकाऱ्यांना कळवून त्यांच्या सेवापुस्तकात योग्य ती नोंद घेण्याची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०७१५०५५५०५०१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Namdeo Kondiba Bhosale

Digitally signed by Namdeo Kondiba Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, serialNumber=8c6a286229ecc7982a08553f49d547ef64be25c7f26fc96324ece7cccbfeb8c5, cn=Namdeo Kondiba Bhosale
Date: 2019.11.07 17:33:21 +05'30'

**( डॉ. ना. कों. भोसले )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
सर्व संबंधित अधिकारी

**प्रत :**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राद्वारे)
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
३. संचालक, लेखा व कोषागारे
४. उद्योग सह संचालक, सर्व विभागीय कार्यालये
५. सर्व संबधित महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र
६. सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. उप सचिव (१२) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. उप सचिव (८) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (उद्योग-३).